सन २०१९-२० करीता आदिम जमाती विकास कार्यक्रम योजनेअंतर्गत प्राप्त निधी वितरणास मान्यता देण्याबाबत

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः केंद्रिय-२०२०/प्र.क्र. ५०/का.-१९
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: १८/३/२०२०

वाचा -

१. जनजाती कार्य मंत्रालय,नवी दिल्ली यांचे पत्र क्र.F.No.११०१४/०२/२०१९-SCA, दि.५/२/२०२०.
२.जनजाती कार्य मंत्रालय,नवी दिल्ली यांचे पत्र क्र.F.No.११०१५/०४(९)/२०१९/Grants/PVTG, दि.०६/०२/२०२०

प्रस्तावना -

केंद्र शासनास सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरीता आदिम जमाती विकास कार्यक्रम अंतर्गत अतिरिक्त निधीसाठी प्रस्ताव सादर करण्यात आले होते. सदर प्रस्तावांच्या अनुषंगाने जनजाती कार्य मंत्रालय, नवी दिल्ली येथे प्रकल्प मुल्यमापन समितीची (Project Appraisal Committee-PAC) बैठक दि. २१/१/२०२० रोजी आयोजित करण्यात आलेली होती. या बैठकीत झालेल्या चर्चेनुसार वाचा क्र. २ येथील आदेशान्वये केंद्र शासनाने एकुण रु. २०००.०० लक्ष निधीच्या प्रस्तावांना मान्यता प्रदान केलेली आहे. यापैकी केंद्र शासनाने ५० टक्के निधी (रु. १०००.०० लक्ष) सदर आदेशान्वये वितरीत केला आहे. तसेच सदर निधी राज्य शासनाच्या एकत्रित निधीत जमा झाल्याचे वित्त विभागाने प्रमाणित केले असुन प्रस्तुत निधी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय (Government resolution)-

केंद्र शासनाने सन २०१९-२० करिता आदिम जमाती विकास कार्यक्रम योजनेअंतर्गत अतिरिक्त निधीतून मंजूर केलेला एकूण रु. १०००.०० लक्ष (रु. दहा कोटी रूपये फक्त) इतका निधी पुढील कामांकरीता खर्च करण्यास याद्वारे शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| क्र | योजनेचे नाव | योजना राबविण्याचे ठिकाण | मंजूर निधी (रू.लाखात) | वितरित केलेला निधी (रू.लाखात) |
|---|---|---|---|---|
| 1 | Housing for PVTG with basic amenities | Yawatmal, Gadchiroli and Raigad districts | १५००.०० | ७५०.०० |
| 2 | Creation of PVTG schools for Madia Gond, Kolam and Katkari tribes | Yawatmal, Gadchiroli and Raigad districts | ५००.०० | २५०.०० |
| | | **एकूण** | **२०००.००** | **१०००.००** |

२. उपरोक्त १०००.०० लक्ष निधीचा खर्च मागणी क्र. टी-५, मुख्य लेखाशीर्ष २२२५- अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण - पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - ०२ - अनुसूचित जमातीचे कल्याण - ७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना, (०१) (४०) आदिम जमातीच्या विकासासाठी केंद्रीय क्षेत्र योजना अन्वये केंद्रीय सहाय्य, ३१ सहायक अनुदाने (२२२५ ३००१) (वेतनेतर) यामधील सन २०१९-२० मध्ये अर्थसंकल्पित असलेल्या निधीतून करण्यात यावा.

३. सदर निधी अर्थसंकल्पिय अंदाज वितरण व संनियंत्रण प्रणालीद्वारे वितरीत करण्यात आला आहे. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांनी वितरीत निधीच्या मर्यादेत निधी तातडीने आहरीत करण्याची दक्षता घ्यावी व संबंधित अपर आयुक्त,आदिवासी विकास / प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प /योजना अंमलबजावणी करणारी यंत्रणा यांना वितरित करावा.

४. या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेले अनुदान ज्या बाबींसाठी खर्च करण्यास मंजूरी देण्यात आलेली आहे, त्याच बाबींसाठी खर्च करावे व त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र आर्थिक व भौतिक अहवालासह शासनास सादर करण्याची दक्षता संबंधितांनी घ्यावी.

**५.** सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ११७/अर्थोपाय, दिनांक १७/३/२०२० अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३१८१३५४०८८४२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Waje Prakash Vijay

Digitally signed by Waje Prakash Vijay
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1b4b695a8c26d140fc5c049d281eedbf23beed9a89ad7526416132cf28f14776, serialNumber=400892e5e82479e4f3c8cf46538dc917b7071e979796d37178d3b709e19155ab, cn=Waje Prakash Vijay
Date: 2020.03.18 13:57:01 +05'30'

**(प्रकाश वि. वाजे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव, आदिवासी विकास यांचे स्वीय सहायक मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
५. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था,पुणे
६. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
८. सहसचिव /उपसचिव,आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.
९. अपर आयुक्त,आदिवासी विकास,ठाणे/नाशिक/अमरावती/नागपूर.
१०.अवर सचिव, भारत सरकार, जनजाती कार्य मंत्रालय, शास्त्री भवन, नवी दिल्ली.

११. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी

१२. सर्व प्रकल्प अधिकारी,एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प

१३. नियोजन विभाग/वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

१४. अवर सचिव/ कार्यासन अधिकारी , का-६, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

१५. निवड नस्ती (का.१९) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.